वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३.०२.२०२३ नुसार महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांच्या आस्थापनेवरील लघुलेखक (उच्चश्रेणी) व लघुलेखक (निम्नश्रेणी) या संवर्गाच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मआवि-२०२४/प्र.क्र.७४७ (ई-८८९७७६)/शिक्षण-१**
९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, नविन मंत्रालय, मुंबई- ४००००१
तारीख: १० मार्च, २०२५

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३.०२.२०२३
२) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ यांचे पत्र जा.क्र.मआविवि/आस्था/७६५/२०२४, दि.१२.०६.२०२४
३) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ यांचे पत्र जा.क्र.मआविवि/आस्था/११७७/२०२४, दि.४.१२.२०२४

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.१ येथील दि.१३.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ च्या अहवालाच्या खंड-२ मधील वेतनश्रेण्यांविषयक व अनुषंगिक शिफारशींच्या स्विकृतीबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच राज्य वेतन सुधारणा समितीने केलेली शिफारस शासनाने मान्य करुन ज्या संवर्गांना सुधारित वेतन स्तर मंजूर केलेले आहेत, अशा संवर्गाची माहिती सदर शासन निर्णयांन्वये नमूद केली आहे. उपरोक्त दि.१३.२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील "विवरणपत्र-अ" अन्वये सर्व प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील लघुलेखक (उच्चश्रेणी) व लघुलेखक (निम्नश्रेणी) या संवर्गांचे वेतनस्तर सुधारित करण्यात आले आहेत. यास्तव कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी उपरोक्त वाचा क्र.२ व ३ अन्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक येथील आस्थापनेवरील शासन मान्य लघुलेखक (उच्चश्रेणी) व लघुलेखक (निम्नश्रेणी) या संवर्गातील पदांना सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३.२.२०२३ अन्वये मंजूर करण्यात आलेला सुधारित वेतनस्तर (विवरणपत्र-अ) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र

आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक येथील आस्थापनेवरील लघुलेखक (उच्चश्रेणी) व लघुलेखक (निम्नश्रेणी) या संवर्गातील शासन मान्य पदांना सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये दर्शविल्यानुसार लागू करण्यात येत आहे.

२. उपरोक्त सुधारित वेतनस्तर लागू करताना वाचा क्र.१ येथील शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती उपरोक्त संवर्गांना लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६/२०२५/सेवा-९, दि.२०.२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१०१२०३५३९०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.03.10 12:04:38 +05'30'

**( डॉ. तुषार पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व परीक्षा), १/२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/ २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०.सर्व सह/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.संचालक, आयुष, मुंबई
१२.कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१३.सहायक संचालक, आयुष संचालनालय, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१४.निवड नस्ती (शिक्षण-१).

## विवरणपत्र- अ

(शासन निर्णय क्र. मआवि-२०२४/प्र.क्र.७४७ (ई-८८९७७६)/शिक्षण-१, दिनांक १० मार्च, २०२५)

राज्य वेतन सुधारणा समितीने केलेली शिफारस शासनाने मान्य केल्यामुळे महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक आस्थापनेवरील ज्या शासन मान्य संवर्गांना सुधारित वेतनस्तर मंजूर करण्यात येत आहे अशा संवर्गांची माहिती दर्शविणारे विवरणपत्र

| अ.क्र. | संवर्गाचे नाव | ७ व्या वेतन आयोगानुसार मंजूर वेतनस्तर | समितीने शिफारस केलेला ७ व्या वेतन आयोगातील सुधारीत वेतनस्तर |
|---|---|---|---|
| १ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | एस-१५: ४१८००-१३२३०० | एस-१६: ४४९००-१४२४०० |
| २ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | एस-१४: ३८६००-१२२८०० | एस-१५: ४१८००-१३२३०० |

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.03.10 12:05:09 +05'30'

( डॉ. तुषार पवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन